कार्यरत व सेवानिवृत्त राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी व अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांचे करिता वैद्यकीय प्रतिपूर्तीची विमाछत्र योजना.

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग-१/कोषा-प्रशा-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १३ जुलै, २०२०.

**वाचा :** (१) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/२०१४ कोषा प्रशा-४, दि.०९.०७.२०१४.
(२) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/२०१४ कोषा प्रशा-४, दि.२५.०६.२०१५.
(३) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/२०१४, कोषा प्रशा-४, दि.२८.०६.२०१६.
(४) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग -१/२०१४, कोषा प्रशा-४, दि.१७.०७.२०१७
(५) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग -१/कोषा प्रशा-४, दि.१६.०७.२०१८
(६) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग -१/कोषा प्रशा-४, दि.१९.०७.२०१९

**प्रस्तावना-**

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ ते ६ च्या शासन निर्णयांन्वये शासकीय सेवेच्या अंतिम वर्षात पदार्पित अखिल भारतीय सेवेसह सर्व राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी व दि.३०.०६.२०११ नंतर सेवानिवृत्त झालेले शासकीय अधिकारी/कर्मचारी व कुटूंब निवृत्तीवेतनधारक यांच्यासाठी वैद्यकीय गट विमा योजना लागू करण्यात आली होती. आता दि.०१.०७.२०२० ते ३०.०६.२०२१ या वर्षाकरिता सदर योजनेचे नुतनीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

वैद्यकीय प्रतिपूर्तीची विमाछत्र योजना गटविमा तत्वावर आधारित आहे. सदर योजना दि.०१.०७.२०२० ते दि.३०.०६.२०२१ या कालावधीत सेवानिवृत्त होणाऱ्या सर्व गट अ, ब, क व ड अधिकारी/कर्मचारी व अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना सक्तीची राहील. शासकीय सेवेत कार्यरत इतर कोणताही अधिकारी/कर्मचारी स्वेच्छेने या योजनेत आवश्यक तो वार्षिक हप्ता भरुन सहभागी होवू शकेल. तसेच दि.३०.०६.२०११ नंतर सेवानिवृत्त झालेला कोणताही अधिकारी/कर्मचारी स्वेच्छेने या योजनेत आवश्यक तो वार्षिक विमा हप्ता भरुन सहभागी होवू शकेल.

२. दि.०१.०७.२०२० ते दि.३०.०६.२०२१ या कालावधीत सेवानिवृत्त होणाऱ्या ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी यापूर्वीच इतर कंपन्यांकडून वैद्यकिय विमा पॉलिसी धारण केलेली आहे, त्यांना संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयातील योजना सक्तीची राहणार नाही. याविषयी संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांनी खात्री करून सूट द्यावी.

३. सन २०१९-२० मध्ये एकुण प्रिमियम रक्कम रूपये २८.२९ कोटी जमा करण्यात आला आहे. तसेच दि.२९.०६.२०२० पर्यंत incurred claim ratio ९४.४२% इतका आहे, असे विमा कंपनीने कळविले आहे. तसेच अद्याप गतवर्षीच्या पॉलिसीची मुदत दिनांक २४.०७.२०२० पर्यंत शिल्लक असल्याने, सदर कालावधीत उद्भवणा-या दाव्यांची संख्या विचारात घेता incurred claim ratio १२० ते १२५% पर्यंत वाढणार असल्याची शक्यता वर्तविली आहे.

४. सदर योजनेची व्याप्ती वाढविण्याच्या दृष्टीने मागील वर्षापासून न्यु इंडिया ॲश्युरन्स कंपनीने कार्यरत शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांचे पती/पत्नी समवेत २५ वर्षे वयाच्या मर्यादेतील दोन अपत्यांचा समावेश योजनेमध्ये केला आहे. तसेच वयोगटनिहाय प्रिमियम आकारणी करुन सन २०२०-२१ करिताचे सुधारीत प्रिमियम दर खालीलप्रमाणे आहेत. सदर दरात १८% GST चा समावेश आहे. अधिकारी/कर्मचारी यांचे नोंदणीच्या वेळी पूर्ण असलेले वय प्रिमियम आकारणीकरीता ग्राहय धरण्यात येणार आहे.

| विमाछत्र रक्कम | १८-३५ वर्षे या वयोगटासाठी विमा हप्ता, कर्मचारी, पती/पत्नी व २ अवलंबित मुले (२५ वर्षे वयाच्या मर्यादेत) | | ३६-५८ वर्षे या वयोगटासाठी विमा हप्ता, कर्मचारी, पती/पत्नी व २ अवलंबित मुले ( २५ वर्षे वयाच्या मर्यादेत) | | ५८वर्षे पेक्षा जास्त वयोगटासाठी विमा हप्ता, कर्मचारी व त्याची पती/पत्नी | |
|---|---|---|---|---|---|---|
| | जीएसटीशिवाय | जीएसटीसह | जीएसटीशिवाय | जीएसटीसह | जीएसटीशिवाय | जीएसटीसह |
| रू. १ लाख | ८७४५ | १०३१९ | ११६६० | १३७५९ | १२८२६ | १५१३५ |
| रू. २ लाख | १०४९४ | १२३८३ | १६४३० | १९३८७ | १८०७३ | २१३२६ |
| रू. ३ लाख | १३९९२ | १६५११ | २१२०० | २५०१६ | २३३२० | २७५१८ |
| रू. ४ लाख | १५१५८ | १७८८६ | २२२६० | २६२६७ | २४४८६ | २८८९३ |
| रू. ५ लाख | २०४०५ | २४०७८ | २७५०० | ३२४५० | ३०२५० | ३५६९५ |
| रू.१० लाख | २९१५० | ३४३९७ | ६०५०० | ७१३९० | ६६५५० | ७८५२९ |
| रू.२० लाख | ५८३०० | ६८७९४ | १०६००० | १२५०८० | ११७००० | १३८०६० |

५. यापूर्वी वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयांतील खालील नमूद अटी व शर्ती कायम राहतील.

i) ज्या सदस्यांनी मागील वर्षी दाव्यांचा प्रतिपूर्तीचा लाभ घेतला आहे, परंतू चालू वर्षी नुतनीकरण केले नाही, अशा सदस्यांना या योजनेत समाविष्ट होण्यास कायमस्वरूपी प्रतिबंधित करण्यात येईल.

ii) विमा कंपनीच्या असे निर्देशनास आले आहे की, रूग्णालयात दाखल झाल्यानंतर विलंबाने त्याची माहिती TPA ला विमा धारकाकडून दिली जाते. त्यामुळे दाव्याची सत्यता

पडताळणीसाठी अडचणी येतात. विमा धारकांनी प्रतिपूर्तीकरिता दावा सादर करतांना दाव्याची सूचना त्रयस्त प्रशासकास (TPA) तीन दिवसांच्या आत न दिल्यास दाव्यावर १०% “Co Pay” लागु असेल. रुग्ण दाखल झाल्याच्या वेळेपासून २४ तासाचा एक दिवस या हिशोबाने शनिवार, रविवार व सर्व सार्वजनिक सुट्टया वगळून ३ दिवस मोजण्यात येतील.

iii) विमा सादर करण्याकरिता नविन विमा धारकांना सक्तीचा १ महिन्याचा प्रतिक्षा कालावधी असेल त्यानंतर २ महिन्यांच्या आत नविन विमाधारकाने विमा दावा सादर केल्यास अशा दाव्यास १०% “Co Pay” लागू असेल. सदर अट Capping असलेल्या रोगांच्या बाबतीतसुद्धा लागु राहील.

iv) जेथे PPN हॉस्पिटल उपलब्ध आहेत, अशा क्षेत्रामध्ये केवळ PPN पॅकेजेस प्रतिपूर्तीसाठी ग्राहय धरली जातील.

**स्पष्टीकरण:- अ)** विमा धारकास कोणत्याही PPN हॉस्पिटलमध्ये उपचार घेण्याची मुभा असेल तथापि प्रतिपूर्ती ही विमा कंपनीच्या PPN पॅकेजेसच्या दराप्रमाणे दिली जाईल. हॉस्पिटलचे दर व PPN दर यातील फरक विमा धारकाने सोसावयाचा आहे.

**ब)** PPN बाहेरील हॉस्पिटलमध्ये उपचार घेण्याचे स्वातंत्र्य विमा धारकास असेल, तथापि अशा प्रकरणी विमा कंपनीच्या प्रचलित धोरणानुसार हॉस्पिटलची अर्हता तपासून कंपनी दावा पारित करेल.

v) विमाछत्र रक्कम रु.१० लाख व रु.२० लाख मधील विमाधारकांना रुम रेंटमध्ये कॅपींग (Capping) खालीलप्रमाणे असेल.

| विमाछत्र रक्कम | सर्वसाधारण वास्तव्याकरिता | अतिदक्षता रुममधील वास्तव्याकरिता |
|---|---|---|
| **रु.१० लाख** | आश्वासित रकमेच्या १% व कमाल रु.८,०००/- च्या मर्यादेत | आश्वासित रकमेच्या २% व कमाल रु.१६,०००/- च्या मर्यादेमध्ये |
| **रु.२० लाख** | आश्वासित रकमेच्या १% व कमाल रु.१५,०००/- च्या मर्यादेत | आश्वासित रकमेच्या २% व कमाल रु.३०,०००/- च्या मर्यादेमध्ये |

vi) सदर योजनेची उर्वरीत कार्यपद्धती संदर्भाधीन अ.क्र.१ ते ३ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार राहील.

६. सदर योजनेच्या कार्यपध्दतीबाबत सविस्तर सूचना संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई यांनी त्यांचे स्तरावर तात्काळ निर्गमित कराव्यात.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००७१३१६५६२२९६०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.07.13 17:04:07 +05'30'

**(इंद्रजित गोरे)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व मा. विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
३. मा. राज्यपाल यांचे सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
५. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
६. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
८. मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई
१५. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२१. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३. सर्व विभागीय आयुक्त

२४. सर्व जिल्हाधिकारी

२५. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

२६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

२७. संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा, कोकणभवन, नवी मुंबई

२८.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२९. सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर

३०. सहसंचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर

३१. वित्त विभागातील सर्व कार्यासने

३२. निवड नस्ती/कोषा प्रशा-४